"आधार" प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी
ओळख कर्त्यांची नियुक्ती करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
**परिपत्रक**
क्रमांक मातंसं २०११/प्र.क्र. ६२७०/प.क्र.३४९/३९,
दिनांक २ डिसेंबर, २०११

**वाचा:-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.मातंसं २०१०/प्र.क्र.७१/३९, दि. ९.९.२०१०
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.२०१०/प्र.क्र.४८/३९, दि. २८.१.२०११

**प्रस्तावना:-**

१. आधार क्रमांक देण्यासाठी रहिवाश्याने ओळखपत्र आणि वास्तव्याचा दाखला सादर करणे आवश्यक आहे. ज्या व्यक्तीकडे ओळखपत्र अथवा वास्तव्याचा पुरावा नसेल अशा व्यक्तीची नोंदणी करण्यासाठी निबंधकाने शासकीय कर्मचा-याची ओळखकर्ता म्हणुन नियुक्ती करण्याबाबत सूचना दि. ९.९.२०१० च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत.

ओळखकर्ता व्यक्तीला त्यांनी खात्री केलेल्या प्रत्येक व्यक्तीसाठी रु. १/- प्रमाणे रक्कम देण्याच्या सूचना दि. २८ जानेवारी २०११ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत. तथापि अनेक ठिकाणी ओळखकर्ता म्हणुन नियुक्ती केलेली नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे म्हणुन निबंधकाना याबाबत पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**परिपत्रक:-**

२. ओळखकर्ता म्हणुन नियुक्ती करण्यासाठी आवश्यक असलेल्या अटी, निकष, ओळखकर्त्यांची कर्तव्ये आणि जबाबदा-या तसेच ओळखकर्त्यांची नियुक्ती करण्यासाठी तसेच त्यावर संनियंत्रण करण्यासाठी कार्यवाही इत्यादी बाबत पुढील प्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत:-

**अ) ओळखकर्ता म्हणुन खालील व्यक्तींची नियुक्ती करता येईल:-**

ग्रामसेवक /ग्राम विकास अधिकारी, तलाठी, गावातील शिक्षक, अंगणवाडी सेविका, आशा सेवक, पोष्टमन राज्यशासनाचे सर्व राजपत्रित आणि अराजपत्रित अधिकारी,नगरपालिका व महानगरपालिकांचे वर्ग १,२, ३ चेअधिकारी किंवा कर्मचारी, राज्य शासन किंवा केंद्र शासनाचे सेवेतील गट-अ किंवा गट-ब पदावरुन निवृत झालेले अधिकारी यांची ओळखकर्ता म्हणून नियुक्ती करता येईल.

**ब) ओळखकर्त्याच्या नियुक्तीसाठी अटी:-**

१) ओळखकर्ता म्हणुन नियुक्त केलेल्या व्यक्तीचा आधार क्रमांक असणे आवश्यक आहे.
२) ओळखकर्ता म्हणुन काम करणारी व्यक्ती सहज उपलब्ध होणारी असावी.
३) ओळखकर्ता म्हणुन काम करणारी व्यक्ती १८ वर्षापेक्षा कमी वयाची नसावी.
४) ओळखकर्ता म्हणुन नियुक्ती करावयाच्या व्यक्तीची गुन्हेगारी पार्श्वभूमी नसावी.

**क) ओळखकर्त्यांची कर्तव्ये-**

१) ज्या व्यक्तीकडे ओळखपत्र किंवा रहिवाशाचा पुरावा नसेल अशा व्यक्तींची ओळख पटवुन ती व्यक्ती नोंदणी करावयाच्या फॉर्ममध्ये नमुद केलेल्या पत्त्यावर रहाते याची खात्री ओळखकर्ता करेल.
२) नोंदणी करण्यासाठी आलेल्या व्यक्तीकडुन ओळखपटवण्यासाठी ओळखकर्ता कोणत्याही प्रकारची फी किंवा शुल्क आकारणार नाही.

**ड) ओळखकर्त्याच्या जबाबदा-या:-**

१) कोणत्याही व्यक्तीस संगनमतकरुन ओळखकर्ता खोटी ओळख पटवणार नाही.

२) एखादया व्यक्तीस संगनमत करुन दुस-या व्यक्तीच्या नांवे खोटी माहिती देणार नाही वा ओळख पटवुन देणार नाही.

३) ओळखकर्त्याने एखादया व्यक्तीची खोटी ओळख पटविली आहे किंवा संगनमतकरुन खोटी ओळख पटविण्याचा प्रयत्न केला आहे असे आढळून आल्यास ओळखकर्त्याविरुध्द दंडात्मक कार्यवाही करण्यात येईल.

**इ) ओळखकर्त्याच्या नियुक्तीसाठी निबंधकाने करावयाची कार्यवाही:-**

१) संभाव्य ओळखकर्त्यांची यादी निबंधकानी तयार करावी.

२) ओळखकर्त्यांची यादी अंतिम करुन ती UIDAI कडे पाठवावी.

३) ओळखकर्त्याकरिता प्रशिक्षण शिबीराचे आयोजन करावे.

४) परिशिष्ठ "अ" प्रमाणे ओळखकर्त्याचे संमतीपत्र भरुन घ्यावे.

५) ओळखकर्त्यांची माहिती वेबसाईटवर अपलोड करावी.

**क) ओळखकर्त्यावरील निबंधकाचे संनियंत्रण:-**

निबंधक खालील निकषांच्या आधारे ओळखकर्त्या कामाचे संनियंत्रण करतील.

१) प्रत्यक्ष आवश्यक असलेले ओळखकर्ता आणि अपेक्षित ओळखकर्ता यांची संख्या.

२) ओळखकर्ता अपेक्षित कार्यक्षेत्र आणि प्रत्यक्ष कार्यक्षेत्र

४. वर नमुद नोंदणीकरिता "आधारकर्ता" म्हणुन काम करणाऱ्या व्यक्तीची नियुक्ती निबंधकानी तातडीने करावी.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक 201112030720300१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(राजेश अग्रवाल)

**सचिव,(मा त.) महाराष्ट्र शासन**

मुख्य सचिव / अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव

सर्व जिल्हाधिकारी / सर्व महानगरपालिका आयुक्त

सर्व नोंदणी करणाऱ्या संस्था

निवड नस्ती कार्या-३९

परिशिष्ठ "अ"

**Annexure A - Consent Form Provided by Introducer**

To,

____________________ (Name / Designation of Registrar Nodal Officer)

____________________ (Name of Registrar)

____________________ (Details of Registrar)

(Registrar -Unique Identification Authority of India)

I , (Name ) ____________________ (S/O, D/O, W/O) __________________ residing at (Address) __________________________________________________ and holding the post of (Designation ) ________________________ at (Organization) _______________________, consent to being a Introducer for the purpose of enabling enrolment of residents for AADHAAR and will follow the guidelines and procedures laid down for Introducers by the Unique Identification Authority of India and the Registrar.

Name:

Designation:

AADHAAR Number / Enrolment number:

Signature:

Date:

**Contact details**

Landline ph no (Office and Home):

Mobile no:

Email address: